व्यवसायकराखालील थकबाकी वसूलीसाठी व अनोंदित करदात्यांचे सर्वेक्षण तसेच करवसूली करण्याकरिता अभिक यांना द्यावयाच्या प्रोत्साहन रकमेत वाढ करणेबाबत.

महाराष्ट्र शासन
वित्त विभाग
शासन निर्णय क्रमांक - व्यकर ११०२/प्र.क्र.५८/२००२/कराधान ३
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२, दिनांक : ३० सप्टेंबर, २००२.

वाचा : शासन निर्णय क्रमांक : व्यकर ११०२/प्र.क्र.५८/२००२/कराधान ३, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२, दिनांक २२ एप्रिल २००२.

प्रस्तावना :-

प्रस्तावनेतील दिनांक २२.४.२००२ च्या शासन निर्णयाद्वारे व्यवसायकर आयुक्त किंवा त्यांनी प्राधिकृत केलेल्या अधिका-यांनी निवड केलेल्या वसूली अभिकर्त्यांना व्यवसायकर थकबाकी वसूलीकरिता वसूलीच्या १% आणि व्यवसायकर भरण्यास पात्र तथापि अनोंदित राहिलेल्या अशा व्यवसायकरदात्यांचा सर्वेक्षणाद्वारे शोध घेऊन त्यांचेकडून संबंधित कालावधीच्या थकीत व्यवसायकर वसूलीतून शासनास प्राप्त होणा-या महसूलाच्या १.२५% प्रोत्साहन रक्कम देण्याचा निर्णय घेतला होता.

सदर निर्णयाचा पुनर्विचार करण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता. त्यावर मंत्रिमंडळ बैठकीत खालीलप्रमाणे निर्णय घेण्यात आला आहे.

निर्णय :

व्यवसायकर वसूली अभिकर्त्यांनी जुन्या व्यवसायकर थकबाकीपैकी प्रत्यक्ष वसूली केलेली कराची रक्कम व व्याज यावर अभिकर्त्यांना ७ % प्रोत्साहनपर रक्कम देण्यात यावी. तसेच नवीन करदात्याचे सर्वेक्षण करुन नावनोंदणी दाखला / नोंदणी दाखला देऊन

त्यांचेकडून संबंधित कालावधीच्या वसूल केलेल्या व्यवसायकराच्या रकमेवर व व्याजाच्या रकमेवर १० % प्रोत्साहनपर रक्कम देण्यात यावी.

"मागणी क्र.जी-१ लेखाशिर्ष २०२०-उत्पन्न व खर्च यावरील कराची वसूली- ००१, संचालन व प्रशासन - व्यवसाय, व्यापार, अजिविका व नोक-या यावरील कर (१) विक्रीकर आयुक्त (२०२० ००२३) - १२, व्यवसायिक व विशेष सेवांसाठी प्रदाने", याअंतर्गत सन २००२-२००३ करिता मंजूर करण्यात येणा-या तरतूदीतून भागविण्यात यावा.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

सही/- एस.एन.जामोदे

( एस.एन.जामोदे )

शासनाचे उप सचिव.

प्रति

१. विक्रीकर आयुक्त, महाराष्ट्र राज्य, विक्रीकर भवन, माझगांव, मुंबई- ४०० ०१०.

२. अपर विक्रीकर आयुक्त, महाराष्ट्र राज्य, विक्रीकर भवन, माझगांव, मुंबई- ४०० ०१०.

३. प्रधान महालेखापाल ( लेखा परीक्षा)-१, महाराष्ट्र, मुंबई.

४. प्रधान महालेखापाल ( लेखा परीक्षा)-२, महाराष्ट्र, नागपूर.

५. महालेखापाल ( लेखा व अनुज्ञेयता )-१, महाराष्ट्र , मुंबई.

६. महालेखापाल ( लेखा व अनुज्ञेयता )-२, महाराष्ट्र , नागपूर.

७. अधिदान व लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई.

८. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई.

९. कार्यासन अधिकारी, विक्रीकर प्रशासन-४,अर्थसंकल्प -३ , अर्थसंकल्प - ७ वित्त विभाग , मंत्रालय, मुंबई.

१०. निवड नस्ती, कराधान-३ .